# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
**शासन ज्ञापन क्रमांक जमीन-१२१८/प्र.क्र.४८७/पोल-७.**

मंत्रालय, दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.

दिनांक ०२ जानेवारी २०१९.

**विषय** :- पोलीस अधीक्षक, गडचिरोली, यांच्या अधिपत्याखालील, (प्रस्तावित) पोलीस मदत केंद्र, सुरजागड आणि पोलीस उप मुख्यालय, प्राणहिता, यांच्याकरिता नवीन प्रशासकीय इमारतींचे बांधकाम करण्यासाठी मंजूर करण्यात आलेल्या वन जमिनींच्या बाबतीत *"Net Present Value," "Compensatory Afforestation (charges)"* व *"Cost of tree felling"* यांचा भरणा करण्यासाठी मंजूरी देण्याबाबत.

**संदर्भ** :-
१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. एफएलडी-२६ए१२/ प्र.क्र.४२६/ फ-१०, दिनांक २६.०२.२०१३.
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. एफएलडी-२०१८/ प्र.क्र.२१३/ फ-१०, दिनांक ११.०९.२०१८.
३) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्या कार्यालयाचे पत्र क्र. पोमसं/ २७-अ/ पोमकें-सुरजागड-प्राणहिता/ भूसंपादन/७१/ २०१८, दिनांक १७.१२.२०१८.

**ज्ञापन.-**

पोलीस महासंचालक, म.रा., यांनी गडचिरोली जिल्ह्यातील, खालील तक्त्यातील स्तंभ (२) मधील प्रयोजनांसाठी, स्तंभ (३) मध्ये नमूद केलेल्या वन जमिनींच्या बाबतीत स्तंभ (४), (५) व (६) यांमध्ये निर्दिष्ट केलेल्या रकमा भरण्यासाठी, एकूण रु.१,१७,११,२४९/- इतकी रक्कम मंजूर करण्याबाबतचा प्रस्ताव सादर केला आहे:-

| अ.क्र. (१) | जमिनीचे प्रयोजन (२) | जमिनीचे वर्णन व क्षेत्रफळ (३) | *Net Present Value* (४) | *Compensatory Afforestation (charges)* (५) | *Cost of tree felling* (६) |
|---|---|---|---|---|---|
| १. | (प्रस्तावित) पोलीस मदत केंद्र, सुरजागड याच्याकरिता नवीन प्रशासकीय इमारतीचे बांधकाम करणे. | सुरजागड बांदे, तालुका-एटापल्ली, येथील वन खंड *(Compartment)* क्र.१९८ मधील ५.० हे. जमीन | रु.४०,१५,०००/- | -- | रु.२७,६८,३३९/- |
| २. | पोलीस उप मुख्यालय, प्राणहिता, याच्याकरिता नवीन प्रशासकीय इमारतीचे बांधकाम करणे. | मौजा अहेरी, तालुका-अहेरी, येथील भूमापन क्र.१८०, वन खंड *(Compartment)* क्र.१०२२ मधील ५.० हे. | -- | रु.४९,२७,९१०/- | -- |

२. शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. एफएलडी-२६ए१२/ प्र.क्र.४२६/ फ-१०, दिनांक २६.०२.२०१३, द्वारे मौजा अहेरी, तालुका-अहेरी, जिल्हा-गडचिरोली, मधील भूमापन क्र.१८०, खंड *(Compartment)* क्र.१०२२, मधील ५.० हेक्टर वन जमीन पोलीस उप मुख्यालय, प्राणहिता, याच्याकरिता नवीन प्रशासकीय इमारतीचे बांधकाम करण्यासाठी वळविण्यास, विवक्षित अटींवर, मंजुरी देण्यात आली आहे. या शासन निर्णयानुसार उक्त जमिनीच्या बाबतीत उपभोक्ता विभागाने *"Compensatory Afforestation"* ची रक्कम म्हणून रु.४९,२७,९१०/- केंद्र शासनाकडे भरणे आवश्यक आहे.

३. तसेच, शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र. एफएलडी-२०१८/ प्र.क्र.२१३/ फ-१०, दिनांक ११.०९.२०१८, द्वारे सुरजागड बांदे, तालुका-एटापल्ली, जिल्हा-गडचिरोली, येथील ५.० हेक्टर वन जमीन ही (प्रस्तावित) पोलीस मदत केंद्र, सुरजागड, याच्याकरिता नवीन प्रशासकीय इमारतीचे बांधकाम करण्यासाठी वळविण्यास, विवक्षित अटींवर, मंजुरी देण्यात आली आहे. या शासन निर्णयानुसार उक्त जमिनीच्या बाबतीत उपभोक्ता विभागाने *"Net Present Value"* म्हणून रु.४०,१५,०००/- इतकी रक्कम केंद्र शासनाकडे व *"Cost of tree felling"* म्हणून रु.२७,६८,३३९/- इतकी रक्कम उप वनसंरक्षक, भामरागड वन विभाग, आलापल्ली, यांच्याकडे भरणे आवश्यक आहे.

**४.** त्या अनुसार, परिच्छेद १ मधील तक्त्यातील स्तंभ (४) व (५) मधील रकमा केंद्र शासनाच्या निर्दिष्ट बँक खात्यात भरणे व स्तंभ (६) मधील रक्कम उप वनसंरक्षक, भामरागड वन विभाग, आलापल्ली, यांच्याकडे भरणे, असे एकूण **रु.१,१७,११,२४९/-** *(रुपये एक कोटी, सतरा लक्ष, अकरा हजार, दोनशे एकोणपन्नास फक्त)* भरण्यास, याद्वारे, मंजूरी देण्यात येत आहे.

**५.** उक्त खर्च हा गृह विभाग, मागणी क्र. बी-१०, "४०७०, इतर प्रशासनिक सेवांवरील भांडवली खर्च, ००, ८००, इतर खर्च, (००) (००)(०७) पोलीसांकरिता भूसंपादन आणि इमारतीचे बांधकाम यांवरील खर्च (कार्यक्रम) (४०७० ०१४२), ५३-मोठी बांधकामे" याखाली उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**६.** हे ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या *www.maharashtra.gov.in* या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१९०१०३१३०९१८३४२९ असा आहे. हे ज्ञापन डीजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SWAPNIL GOPAL BORSE

Digitally signed by SWAPNIL GOPAL BORSE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=c6a6e7cad855fc787a96e36f11fbc87a9f66cfd9bad01184493f2735ad885627, postalCode=400032, street=2ND FLOOR,MANTRALAYA,MADAME CAMA MARG,MUMBAI, serialNumber=8538cd1e408948f7d025537d5f6589bd8958d1b95322e66d2cc5edf89ad0d79e, ou=HOME DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=SWAPNIL GOPAL BORSE
Date: 2019.01.03 13:16:37 +05'30'

**(स्वप्नील गोपाल बोरसे)**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) पोलीस महासंचालक, म.रा., मुंबई.
२) पोलीस उपमहानिरीक्षक, गडचिरोली परिक्षेत्र, मुक्काम-नागपूर.
३) पोलीस अधीक्षक, गडचिरोली.

**प्रत-**

१) जिल्हाधिकारी, गडचिरोली.
२) उप वनसंरक्षक, भामरागड वन विभाग, आलापल्ली, जिल्हा-गडचिरोली.
३) जिल्हा कोषागार अधिकारी, गडचिरोली.
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.
५) कार्यासन अधिकारी (व्यय-७/ विनियम), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) निवड फाईल (पोल-७).